**मृत्यू पावलेल्या 'एकट्या' शासकीय कर्मचाऱ्यावर अवलंबून असलेल्या त्याच्या आई-वडिलांना कुटुंब -निवृत्तीवेतन देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कुनिवे -२०११/प्र. क्र. ५४/ सेवा-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २२ जानेवारी, २०१५.

**प्रस्तावना -**

सेवेत असताना अथवा सेवानिवृत्तीनंतर शासकीय कर्मचाऱ्याचा मृत्यू झाल्यास चरितार्थाचे साधन नसल्याने पूर्णतः त्याच्या / तिच्यावर अवलंबून असलेले त्याचे /तिचे पालक महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ अन्वये कुठल्याही कुटुंब निवृत्तीवेतनास पात्र होत नाहीत. प्रचलित सेवानिवृत्तीवेतन नियमातील 'कुटुंब' या संज्ञेच्या व्याख्येत शासकीय कर्मचाऱ्याचे पालक समाविष्ट नाहीत हे त्याचे कारण आहे. सामाजिक सुरक्षेचा उपाय म्हणून सेवानिवृत्तीवेतन नियमात आता सुधारणा करण्यात आलेली असून त्यात व्याख्या केलेल्या 'कुटुंब' या संज्ञेच्या व्याप्तीचा विस्तार करून त्यात केवळ 'एकट्या' शासकीय कर्मचाऱ्याच्या पालकांचा समावेश करण्यात आलेला आहे. 'एकटा' शासकीय कर्मचारी या संज्ञेचीही त्याप्रमाणे व्याख्या करून ती महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मध्ये समाविष्ट करण्यात आलेली आहे. या इच्छित सामाजिक सुरक्षा उपायास मूर्त स्वरूप देण्यासाठी खालील निर्णय घेण्यास शासनास हर्ष होत आहे.

## शासन निर्णय-

१) हा शासन निर्णय तो निर्गमित केल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल व या शासन निर्णयाच्या प्रयोजनार्थ तो -नियत दिवस ' असेल.

२) 'एकटा' शासकीय कर्मचारी म्हणजे आपल्या पालकांचे हयात असलेले एकमेव अविवाहित अपत्य अथवा विवाहित असल्यास ज्याची/ज्याचा पत्नी/पती व मुले हयात नाहीत असा शासकीय कर्मचारी.

३) 'एकट्या' शासकीय कर्मचाऱ्यावर पूर्णतः अवलंबून असलेले पालक म्हणजे आपल्या आर्थिक निर्वाहासाठी ज्यांच्याकडे कोणते/ताही साधन/स्रोत नाही व आपल्या सर्व गरजांसाठी जे त्याच्या/तिच्यावर पूर्णतः अवलंबून आहेत, असे पालक.

४) निवृत्तीवेतन नियमातील नियम ११६ च्या खंड (१६) (बी) (एक), (दोन) आणि (तीन) प्रमाणे असलेले कुटुंब अस्तित्वात नसेल तरच मृत पावलेल्या 'एकट्या' शासकीय कर्मचाऱ्यावर पूर्णतः अवलंबून असलेले पालक कुटुंब निवृत्ती वेतनास पात्र ठरतील

५) मृत पावलेल्या 'एकट्या' शासकीय कर्मचाऱ्याने खाली अनुक्रमांक (६) मध्ये विहित केलेल्या वेळेत व पद्धतीने आपल्या पालकांची नावे घोषित केलेली असतील केवळ तरच अशा शासकीय कर्मचाऱ्यावर पूर्णतः अवलंबून असलेले त्याचे/तिचे पालक कुटुंबनिवृत्तीवेतनास पात्र असतील.

६) जो शासकीय कर्मचारी,

(अ) 'नियत दिवशी' शासकीय सेवेत आहे व ज्याला निवृत्तीवेतन नियम लागू आहेत तो त्याच्या सध्याच्या विभाग प्रमुखाकडे अथवा त्याचा/तिचा कार्यालय प्रमुख वर्ग -1 पेक्षा कनिष्ठ दर्जाचा नसल्यास यथास्थिती, त्यांच्याकडे असे घोषणापत्र सादर करू शकेल.

(ब) जो शासकीय कर्मचारी नियत वयोमानानुसार अथवा स्वेच्छानिवृत्तीद्वारे नियुक्त दिनांका अगोदरच सेवानिवृत्त झालेला आहे व 'नियत दिवशी' निवृत्तीवेतनाचा लाभ उपभोगत आहे तो त्याच्या/ तिच्या सेवानिवृत्तीच्या वेळी तो/ ती ज्या कार्यालयात कार्यरत होता/होती त्या कार्यालयाच्या विभाग प्रमुखाकडे अथवा त्याच्या /तिच्या त्या कार्यालयाचा कार्यालय प्रमुख वर्ग- 1 पेक्षा कनिष्ठ दर्जाचा नसल्यास यथास्थिती, त्यांच्याकडे 'नियत दिवसापासून' नव्वद दिवसांच्या कालावधीत असे घोषणापत्र सादर करू शकेल.

७) ज्या शासकीय कर्मचाऱ्याने,

१) वर विहित केल्याप्रमाणे घोषणापत्र सादर करण्यात कसूर केली असेल,आणि

२) ज्या शासकीय कर्मचाऱ्याचा

( अ ) विभागीय चौकशीच्या प्रलंबिततेच्या कालावधीत अथवा

(ब) अनधिकृत अनुपस्थितीच्या कालावधीत मृत्यू झाला असेल,

अशा शासकीय कर्मचाऱ्याचे पालक कुटुंब निवृत्तीवेतनाच्या लाभास पात्र असणार नाहीत.

८) शासन असाही आदेश देत आहे की, ज्यांना निवृत्तिवेतन योजना लागू केलेली आहे अशा मान्यता व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे यांमधील पात्र निवृत्तिवेतनधारक/कुटुंब निवृत्तिवेतनधारक यांना वरील निर्णय, योग्य त्या फेरफारांसह, लागू राहील.

९) महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम, १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक पाच) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार आणि त्यासंबंधातील इतर सर्व अधिकार यांचा वापर करुन शासन असाही आदेश देत आहे की, वरील निर्णय जिल्हा परिषदांचे पात्र निवृत्तिवेतनधारक/कुटुंब निवृत्तिवेतनधारक यांनाही लागू राहील.

१०) यासंबंधीचा खर्च वरील परिच्छेदात नमूद केलेल्या निवृत्तीवेतनधारकांची निवृत्तीवेतने ज्या अर्थसंकल्पीय शीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात, त्या शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या शीर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

११) महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मध्ये यथावकाश सुधारणा करण्यात येतील.

१२) सदर शासन निर्णयाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२७१५३५०४४९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN BHASKAR RINGANE

Digitally signed by NARAYAN BHASKAR RINGANE
DN: CN = NARAYAN BHASKAR RINGANE, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2015.01.27 18:32:32 +05'30'

**ना.भा.रिंगणे**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१००० प्रती),
२) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर(१००० प्रती),
३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती),
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),
६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),
७) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,(१० प्रती)
८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
९) उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती),
१०) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
११) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
१३) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
१४) राज्यपालांचे सचिव,
१५) मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१६) उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१७) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
१८)*विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,

१९) *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,

२०) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,

२१) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

२२) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

२३) *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

२४) *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद

२५) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.

२६) आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)

२७) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२

२८) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबइ

२९) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.

३०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.

३१) कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०

३२) अध्यक्ष, महाराष्ट्र स्टेट गव्हर्नमेंट पेंशनर्स असोसिएशन बेळगाव, १०९१, अनंतशयन गल्ली, लक्ष्मी निवास, दुसरा मजला, बेळगांव.

३३) मंत्रालयातील सर्व विभाग,

३४) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,

३५) सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),

३६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

३७) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष

३८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

३९) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),

४०) तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),

४१) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),

४२) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),

४३) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

४४) सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

४५) कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),

४६) कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),

४७) कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),

४८) कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),

४९) कुल सचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर (१० प्रती),

५०) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड (१० प्रती),

५१) कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर (५ प्रती),

५२) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)

५३) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २० (५ प्रती)

५४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,, मुंबई ४ ( ५ प्रती)

५५) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५प्रती )

५६) इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती )

५७) नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१ ( ५ प्रती )

५८) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)

५९) वित्त विभागातील सर्व कार्यासने,

६०) निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

*पत्राद्वारे.

## नमुना ३ अ

[ नियम ११६ (१६) (बी)]

**<u>शासकीय कर्मचाऱ्याने आपल्या विभाग प्रमुखापुढे अथवा कार्यालय प्रमुख वर्ग-१ पेक्षा निम्न दर्जाचा नसल्यास त्याच्यापुढे सादर करावयाचे स्वयं-घोषणापत्र .</u>**

मी/ श्री/श्रीमती ................................................. , वय ...वर्षे, राहणार (येथे स्थायी पत्ता नमूद करावा) .......................................सध्या (येथे सध्याचा पत्ता नमूद करावा) .......................................... येथे राहत असून मी याठिकाणी शपथपूर्वक घोषित करतो/ते की,

१) मी हे स्वयं-घोषणापत्र सादर करण्याच्या दिनांकास महाराष्ट्र शासनाच्या (येथे विभागाचे नाव नमूद करावे) ..........विभागात .........या पदी (याठिकाणी आपण धारण करीत असलेले पद नमूद करावे ) काम करीत असून महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम , १९८२ मला लागू असल्याने या नियमांखालील निवृत्तीवेतनाचे लाभ मला अनुज्ञेय आहेत.

२) माझी आई सौ./श्रीमती ............................................ , वय…… वर्षे . आणि/अथवा माझे वडील श्री ........................................... . वर नमूद केलेल्या पत्त्यावर राहत असून तिच्या /त्यांच्या आर्थिक निर्वाहासाठी तिच्या/त्यांच्याकडे कुठले/लाही स्वतंत्र साधन/स्रोत नसल्याने ती/ते तिच्या/त्यांच्या सर्व आर्थिक गरजांसाठी पूर्णतः माझ्यावरच अवलंबून आहेत.

मी माझी आई किंवा/आणि वडील यांच्या सोबतचे एकत्रित छायाचित्र या स्वयं-घोषणापत्रावर चिकटवीत आहे.

[ हे घोषणापत्र सादर करण्याच्या वेळी शासकीय कर्मचारी ज्या कार्यालयात कार्यरत आहे त्याच्या विभाग प्रमुखासमोर अथवा त्याचे/ तिचे कार्यालय प्रमुख वर्ग- १ पेक्षा कनिष्ठ दर्जाचे नसल्यास यथास्थिती, त्यांच्यासमोर छायाचित्रावर व या स्वयं- घोषणापत्रावर स्वाक्षरी करावी]

दिनांक शासकीय कर्मचाऱ्याची स्वाक्षरी

स्थळ

विभागप्रमुख / कार्यालय प्रमुख वर्ग-१ पेक्षा कनिष्ठ दर्जाचे नसल्यास यथास्थिती यांची स्वाक्षरी

कार्यालयाची मुद्रा

**Grant of Family Pension to the wholly dependent Parents of a deceased 'single' Government servant**

# Government of Maharashtra
## Finance Department
## Government Resolution No.: PEN 2011/CR-54/Seva-4

Hutatma Rajguru Chowk, Madam Cama Road,
Mantralaya, Mumbai 400 032.
Date: 22nd January, 2015.

**Introduction -**

As per Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, the parents of a Government servant, having no independent means of sustenance and are wholly dependent on him/her, are not entitled to any family pension in the event of his/her death either while in service or after his/her retirement. This is due to the fact that the definition of the term, 'family', under the existing Pension Rules, does not cover parents of a Government servant. As a social security measure, therefore, the scope of the term, 'family', defined under the Pension Rules, has been enlarged restrictively, by amending it suitably to include into its ambit, only the wholly dependent parents of a 'single' Government servant. The term, 'single' Government servant has also been defined and inserted in the Pension Rules accordingly. To give effect to the intended security measure, the Government is pleased to pass the following resolution.

**Resolution**

1. This Government Resolution, shall come into effect from the date of its issue and shall be the 'appointed day' for the purpose of this Resolution.
2. A 'single' Government servant would mean a Government servant, who is the only surviving child of his parents and is unmarried or if married, who has no surviving spouse and children
3. Wholly dependent parents of a Government servant means such parents who do not have any independent means/source of economic sustenance and are solely dependent on him/her, for all their financial needs.

4. The wholly dependent parents of a deceased 'Single' Government Servant shall be entitled to family pension under the Pension Rules if his 'family', as defined under clause (16)(b) (i) (ii) and (iii),of rule 116 of the said rules, ceases to exist.

5. The wholly dependent parents of a deceased 'Single' Government Servant shall be entitled to family pension only if the names of the parents are declared by him/her, at the time and in the manner specified at Sr. No. 6 below.

6. In the case of a Government servant who,

(a) is in Government service on the appointed day and is governed by the Pension Rules may file such declaration with the Head of his/her present Department or the Head of his/her present office if such officer is not below the rank of Class I Officer.

(b) has retired before the appointed day on attaining the age of superannuation or has retired voluntarily before the appointed day and is entitled to or enjoying the pensionary benefits on the appointed day, may file such declaration within a period of ninety days from the appointed day, with the Head of the department or as the case may be, with the Head of the office, where such Government servant was working at the time of his/her retirement if such officer is not below the rank of Class I Officer.

7. . The pensionary benefits shall not be admissible to the parents of a Government servant who,

1) Has failed to file a declaration as specified above, and

2) Dies during,

(a) The pendency of a Departmental Enquiry instituted against him/her.

(b) The period of his/her unauthorized absence while in service.

8. Government is also pleased to direct that above decision should mutatis mutandis, apply to those employees and pensioners of Recognised and Aided Educational Institutions, Non-Agricultural Universities and Affiliated Non-Government Colleges and Agricultural Universities to whom the pension scheme is made applicable.

9. In exercise of the powers conferred by the proviso to Section 248 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samities Act, 1961 (Mah. V of 1962)

and of all the other powers enabling it in that behalf, Government is further pleased to decide that the above decision shall apply to the employees and pensioners of Zilla Parishads.

10. The expenditure on this account should be debited to the Budget Heads to which the retirement benefits of the employees mentioned in the above paras are debited and should be met from the grants sanctioned there under.

11. A formal amendment to Maharshtra Civil Services (Pension) Rules, 1982,will be made in due course.

This Government resolution of Maharashtra Government is available at the website www.maharashtra.gov.in. Reference no. for this is 201501271535044905. This order has been signed digitally.

By order and in the name of the Governor of Maharashtra.

NARAYAN BHASKAR RINGANE

Digitally signed by NARAYAN BHASKAR RINGANE
DN: CN = NARAYAN BHASKAR RINGANE, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2015.01.27 18:34:20 +05'30'

**N.B.Ringne**
Deputy Secretary to Government of Maharashtra

**FORM NO 3A**

**[Rule 116 (16)(b)]**

**SELF DECLARATION TO BE FILED BY A GOVERNMENT SERVANT BEFORE THE HEAD OF THE DEPARTMENT OR HEAD OF THE OFFICE WHO IS NOT BELOW THE RANK OF A CLASS-I OFFICER.**

I, Mr/ Mrs/Miss ……………………………age ……….. yrs, a permanent resident of ( mention here your permanent address)………………………………………. ………………………………………..and presently staying at, (mention here your current address) ………………………………….. do hereby declare on solemn affirmation, that,

1) I am holding the post of (mention here the post you hold on the day of this self declaration) …………………………………in the (mention here the department you are working in as on the date of this self-declaration) ……………….. department of the Government of Maharashtra on the date of this declaration and being governed by the Maharashtra Civil Service (Pension) Rules, 1982, am entitled to/getting the pensionary benefits under the said rules

2) My mother Mrs/Smt………………………………aged……..yrs and /or my father Shri …………………………,aged……yrs is staying with me at my above mentioned address and that having no independent means/source of economic sustenance of her/his own is solely dependent on me for all her/his financial needs.

I am affixing below a copy of my combined photograph with my mother and/or father

[ To be attested by the Government servant before the Head of the Department or as the case may be, before the Head of the office where he/she is working as on the day of this declaration If such officer is not below the rank of a Class –I Officer ]

Date Signature of the Government Servant.

Place

Signature of Head of Department / Head of Office if such officer is not below the rank of Class –I Officer as the case may be

Seal of the office.